डोंगरी विभाग विकास कार्यक्रमांतर्गत
सन २०१८-१९ मधील निधी वितरण.

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : डोंविका-२०१८/प्र.क्र.५५ / का-१४८३**
मादाम कामा,मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
**दिनांक :- २७ जून, २०१८.**

**संदर्भ :-** १) शासन निर्णय, नियोजन विभाग, क्रमांक डोंविका-२००९/प्र.क्र.६/का.१४८३, दि.१८.१.२०१०.
२) शासन निर्णय, नियोजन विभाग, क्रमांक डोंविका-२०१५/प्र.क्र.३५/का.१४८३, दि.३१.७.२०१५
३) शासन शुध्दीपत्रक, नियोजन विभाग, क्रमांक डोंविका-२००९/प्र.क्र.६/का.१४८३, दि.३१.०१.२०१८.
४) शासन परिपत्रक वित्त विभाग, अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३,दि.२.०४.२०१८.
५) शासन निर्णय समक्रमांक दि.२७.४.२०१८.
६) शासन निर्णय क्र.डोंविका-२०१५/प्र.क्र.४२/का.१४८१-अ, दि.१५.६.२०१८

**शासन निर्णय :-**

डोंगरी विभाग विकास कार्यक्रमांतर्गत सन २०१८-१९ या वर्षासाठी रु.९५००००.०० हजार इतका निधी अर्थसंकल्पित करण्यांत आला आहे. संदर्भ क्र.(४) येथील वित्त विभागाच्या दिनांक २.४.२०१८ च्या परिपत्रकान्वये सन २०१८-१९ च्या प्रथम नऊमाहीकरीता रु.६६५०००.०० हजार (७०%) इतका निधी अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर वित्त विभागाने उपलब्ध करून दिलेला आहे. त्यानुसार संदर्भ क्र. ५ येथील दि.२४.७.२०१८ च्या शासन निर्णयान्वये **रु.६३३५००.०० हजार** निधीचे वितरण अर्थसंकल्प वितरण प्रणालीद्वारे करण्यात आले आहे. **संदर्भ क्र.६ येथील शासन निर्णयान्वये अस्तित्वातील डोंगरी तालुक्यांच्या विभाजनाने नव्याने निर्माण झालेल्या दोडामार्ग (जि.सिंधुदुर्ग), त्र्यंबकेश्वर (जि.नाशिक), माहूर (जि.नांदेड) या तीन पूर्णगट व विक्रमगड (जि.पालघर), देवळा (जि.नाशिक), फुलंब्री (जि.औरंगाबाद) या तीन उपगट डोंगरी तालुक्यांचा समावेश डोंगरी विभाग विकास कार्यक्रमात करण्यात आला आहे.** पूर्णगट डोंगरी तालुक्यास रु.१००.०० लाख व उपगट तालुक्यास रु.५०.०० लाख याप्रमाणे निधी उपलब्ध करुन देण्यात येत असून, वित्त विभागाच्या संदर्भ क्र. (४) येथील परिपत्रकान्वये ७०% **च्या मर्यादेत** (रु. ४५०.०० लाख (७०%) ) रु.**३१५००.०० हजार (रुपये तीन कोटी पंधरा लाख फक्त) बीम्स प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे**. निधी वितरणाचा तपशिल सोबतच्या परिशिष्ट- अ मध्ये दर्शविला आहे.

**अटी व शर्ती :-.**

**(१)** सदरचा निधी संदर्भाधीन शासन निर्णयांमधील व शासन परिपत्रकातील मार्गदर्शक सूचनांनुसार सर्व संबंधीत यंत्रणांना **तात्काळ** वितरीत करण्यात यावा.

**(२)** वितरीत केलेल्या निधीतून प्रथमत: मागील आर्थिक वर्षात सुरु झालेली व आता अपूर्ण असलेली कामे पूर्ण करण्याकरिता म्हणजेच **स्पील ओव्हरकरिता प्राथम्याने** उपलब्ध करुन द्यावा.

**(३)** या कार्यक्रमांतर्गत होणा-या खर्चाचे नियंत्रण महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका खंड १ परि.१५५ मधील सूचनांनुसार करण्यांत यावा. तसेच **एकत्रित खर्च ताळमेळ दरमहा महालेखापाल यांचे लेख्याशी घालावा.** दर तिमाही खर्चाचा मेळ महालेखापाल यांचे कार्यालयात ठेवण्यात आलेल्या नमुन्यातील नोंदवहीशी पडताळणी, तिमाही संपल्यापासून दोन महिन्याचे आंत घ्यावा आणि त्याबाबतचा एकत्रित अहवाल शासनास सादर करावा.

**(४)** या कार्यक्रमांतर्गत केलेल्या खर्चाचे आर्थिक व भौतिक साध्य (कामनिहाय) शासनास दरमहा ५ तारखेपूर्वी सादर करावेत. तसेच पूर्ण झालेल्या कामांचा, काम पूर्णत्वाचा दाखला व काम हस्तांतरीत केल्याचा दाखला देखिल, शासनास सादर करावा. प्रलंबित उपयोगिता प्रमाणपत्रे महालेखापाल कार्यालयास त्वरित सादर करण्यात यावीत, व त्याची एक प्रत शासनास पाठवावी.

**(५)** राज्य निवडणूक आयोगाचे वेळोवेळी निवडणूकी संदर्भातील आचारसंहितेचे निर्गमित होणारे आदेश विचारात घेऊन, योग्य ती कार्यवाही करण्याची दक्षता घ्यावी.

**(६)** सर्व नियंत्रक अधिका-यांनी शासन परिपत्रक वित्त विभाग, दि. २.४.२०१८ ची पुर्तता होत असल्याची खात्री केल्यानंतरच निधी खर्च करावा.

**(७) निधी खर्च करताना तो विहीत कार्यपध्दती अनुसरुन सर्व वित्तीय कायदे/टेंडर नियमावली व नियमांचे/प्रक्रिया अवलंबून/वित्तीय अधिकारांच्या (financial power) मर्यादेत/ P.W.D. मॅन्युअलचे अधीन राहुन/ C.V.C. च्या मार्गदर्शक तत्वानुसार/ CAG च्या निर्देशानुसार/ प्रचलित शा.नि./ नियम/ परिपत्रक/ तरतूदीनुसार/ बजेट व कोषागार नियमावलीनुसार खर्च करण्याची तसेच कोणत्याही परिस्थितीत कुठलाही शासन नियम/अधिकाराचा भंग/अटी व शर्तीचा भंग होणार नाही याची जबाबदारी संबंधित नियंत्रक अधिका-याची राहील.**

२. सदरचा खर्च, " मागणी क्रमांक **ओ-११, ४५५१ -डोंगराळ क्षेत्रावरील भांडवली खर्च ०१ पश्चिम घाट ०६० इतर डोंगरी क्षेत्रे (००) (०१) डोंगराळ क्षेत्राकरिता विशेष कार्यक्रम (४५५१ ००११) (योजनांतर्गत) (दत्तमत) - ५३- मोठी बांधकामे"** या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात येऊन, तो मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. सदरचे आदेश शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक ०२.०४.२०१८ अन्वये दिलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०१८०६२७१६३७४०४७१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**सोबत**:वरीलप्रमाणे-परिशिष्ट-अ

Asmita Prakash Gawade

Digitally signed by Asmita Prakash Gawade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f988da35b3597ef287d5bce1a7470bc51998c83f335a4302 0eb04618a70b0c3a, 2.5.4.45=03210093254807F75DAE25044CA08368398D472EB2C8E EB5FE6CF53D81F22BFE3FB0D9, cn=Asmita Prakash Gawade
Date: 2018.06.28 12:03:53 +05'30'

**( अ. प्र. गावडे )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

जिल्हाधिकारी, सिंधुदुर्ग/नाशिक/औरंगाबाद/पालघर.

**प्रत,**

१) महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
३) विशेष कार्य अधिकारी (नियोजन), विभागीय आयुक्तांचे कार्यालय, कोकण, नाशिक, औरंगाबाद, विभाग,
४) जिल्हा नियोजन अधिकारी, द्वारा- जिल्हाधिकारी कार्यालय, सिंधुदुर्ग/नाशिक/औरंगाबाद/पालघर,
५) जिल्हा कोषागार अधिकारी, सिंधुदुर्ग/नाशिक/औरंगाबाद/ पालघर,
६) वित्त विभाग (व्यय-८/ अर्थसंकल्प-१६), मंत्रालय, मुंबई ३२.
७) निवड नस्ती, (कार्यासन-१४८१-अ).

**(शासन निर्णय, नियोजन विभाग क्रमांक : डोविका-२०१८/प्र.क्र.५५/ का-१४८१-अ,**
**दि. २७ जून, २०१८ चे सहपत्र)**

## परिशिष्ट- अ

*(रु. हजारात)*

| अ.क्र. | जिल्हा | पूर्णगट | उपगट | या आदेशान्वये वितरित करण्यात येणारा निधी | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | | पूर्ण गटासाठी | उपगटासाठी | जिल्हयाचा एकूण निधी (६+७) |
| १ | २ | ३ | ४ | ६ | ७ | ८ |
| १. | सिंधुदूर्ग | **१.दोडामार्ग** | | ७०००.०० | | ७०००.०० |
| २. | नाशिक | **२. त्र्यंबकेश्वर** | | ७०००.०० | -- | १०५००.०० |
| | | | **१. देवळा** | | ३५००.०० | |
| ३. | नांदेड | **३. माहूर** | | ७०००.०० | -- | ७०००.०० |
| ४ | पालघर | | **२. विक्रमगड** | | ३५००.०० | ३५००.०० |
| ५. | औरंगाबाद | | **३. फुलंब्री** | | ३५००.०० | ३५००.०० |
| | *एकुण* | | | | | ***३१५००.००*** |

Asmita Prakash Gawade

Digitally signed by Asmita Prakash Gawade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f988da35b3597ef287d5bce1a7470bc51998c83f335a43020eb046 18a70b0c3a, 2.5.4.45=03210093254807F75DAE25044CA08368398D472EB2C8EEB5FE6 CF53D81F22BFE3FB0D9, cn=Asmita Prakash Gawade
Date: 2018.06.28 12:04:04 +05'30'

(अ. प्र. गावडे )
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन